बीड जिल्हा परिषदेच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या पहिल्या टप्प्याच्या फर्निचर व अंतर्गत सजावटीच्या कामांस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः जिपई-२०१८/प्र.क्र. ११२/बांधकाम-४
मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
तारीख: २४ जुलै , २०१८

वाचा :- १) शासन निर्णय क्र. जिपई २०१२/ प्र.क्र. १०५/ पंरा-७ दि. ०२.०५.२०१४
२) अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांचे पत्र क्र. बांवि/तांशा-४/५३८ दि. १९.०५.२०१८ चे पत्र.

प्रस्तावना :-

१. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांनी संदर्भीय पत्रान्वये बीड जिल्हा परिषदेच्या प्रशासकीय इमारतीच्या पहिल्या टप्प्याच्या फर्निचर व अंतर्गत सजावटीच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

२. बीड जिल्हा परिषदेच्या नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या पहिल्या टप्प्याकरीता दिनांक ०२.०५.२०१४ च्या शासन निर्णयान्वये रु. १८३५.५४ लक्ष इतक्या रक्कमेची प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. बीड जिल्हा परिषदेचे पहिल्या टप्प्याचे बांधकाम जवळपास पुर्ण असून त्या ठिकाणी दैनंदीन कामकाज सुरु करण्याच्या दृष्टीने फर्निचरची नितांत आवश्यकता आहे. प्रत्यक्ष कार्यालयीन गरजेनुसार इमारतीच्या अंतर्गत फर्निचरचे सविस्तर रेखा नकाशे व अंदाजपत्रक तयार केले असता सदरील अंदाजपत्रकाची किंमत रु. ४९९.२० लक्ष एवढी होत आहे. सदरील अंदाजपत्रकाचे दर सन २०१७-१८ च्या दरसूचीवर आधारीत आहे. सदरील अंदाजपत्रकात पदाधिकारी व अधिकारी यांची आसन व्यवस्था तसेच प्रत्येक विभाग निहाय अधिकारी व कर्मचारी यांची आसन व्यवस्था, स्वागत कक्ष इत्यादी बाबींचा समावेश केला आहे.

३. बीड जिल्हा परिषदेचे पहिल्या टप्प्याचे बांधकाम जवळपास पुर्ण असून त्या ठिकाणी दैनंदीन कामकाज सुरु करण्याच्या दृष्टीने फर्निचरची नितांत आवश्यकता असल्यामुळे, अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांनी रुपये ४,९९,१९,९१३/- इतक्या किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक सादर केले आहे. सदरील अंदाजपत्रकांस अधिक्षक अभियंता सा.बां.मंडळ उस्मानाबाद यांची तांत्रिक मान्यता घेण्यात आली आहे.

४. अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या तांत्रिक छाननी अंती, बीड जिल्हा परिषदेच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या पहिल्या टप्प्याकरीता

फर्निचर व अंतर्गत सजावटीच्या कामांस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत रुपये ४,९९,२०,०००/- इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

५. बीड जिल्हा परिषदेच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या फर्निचर व अंतर्गत सजावटीच्या कामांस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत एकूण रक्कम रुपये ४,९९,२०,०००/- (रुपये चार कोटी नव्व्याण्णऊ लक्ष वीस हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या कामांस पुढील अटींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

१) बीड जिल्हा परिषदेच्या प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी शासन निर्णय, सा.बां.वि.क्र.सीएटी-१०९६/प्र.क्र.१७२/ इमारती-२, दि.७.१.२००४ नुसार विहीत केलेल्या नोंदणीकृत फर्निचर /मॉड्युलर फर्निचर उत्पादक अथवा पुरवठादार/ अंतर्गत सजावटकार यांच्याकडून विहीत कार्यपध्दती अनुसरुन फर्निचरचे काम करुन घेणे बंधनकारक राहील.

२) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

३) या कामी प्रशासकीय मान्यता किंमतीपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती/ जिल्हा परिषदेने सोसावा.

४) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त एका वर्षात पूर्ण होईल, असे संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी नियोजन करावे.

५) प्रस्तुत कामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.) जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

६. बीड जिल्हा परिषदेच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या पहिल्या टप्प्याच्या फर्निचर व अंतर्गत सजावटीच्या कामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढील प्रमाणे आहे:-

| FINAL GENRAL ABSTACT FOR BEED ZILLA PARISHAD BUILDING FIRST STEP'S FURNITURE AND INTERNAL DECORATION WORK | | |
|---|---|---|
| Sr. | Description of item | Cost Rs. |
| 1 | Cost of Furniture Work | 39872217.00 |
| 2 | Cost of Wooden & Liner False ceiling Work | 912026.00 |
| | Sub Total (A) | 40784243.00 |
| 3 | Add for Architectural fee 4.40% of (A) | 1794507.00 |
| 4 | Add for GST 18% of (A) | 7341164.00 |
| | Total Rs. | 49919914.00 |
| | Says Rs. | 49920000.00 |

७. उपरोक्त बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात टप्प्या-टप्प्याने निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल. यावरील खर्च " २५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३) " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

८. प्रस्तुत कामाची माहिती कंस्ट्रक्शन ट्रॅकर प्रणालीवर अद्ययावत करावी.

९. प्रस्तुतचा शासन निर्णय वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०७२४११४०१०६७२० आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development And Water Conservation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e461e0a32ec649f0a60e4372f7cbbb3edff433d33cc0d95db6f8dbf1fa4f7f, cn=Dilip Babasaheb Patil
Date: 2018.07.24 12:43:18 +05'30'

( दि.बा. पाटील )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद
२) विभागीय आयुक्त औरंगाबाद, विभाग औरंगाबाद
३) महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
४) मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो.,कॅम्प ऑफिस, मध्यवर्ती इमारत, पुणे
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद बीड
६) अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद बीड
७) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद बीड
८) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद बीड
९) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा बीड
१०) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
११) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
१२) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, बीड
१३) निवडनस्ती-बांधकाम-४